**सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करणे, प्रकल्प व्यवस्थान सल्लागार शुल्क व त्याच्या प्रदानाबाबत मार्गदर्शक सूचनांमध्ये सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१८/प्र.क्र.५४/नवि-१६**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १७ डिसेंबर, २०१८

<u>संदर्भ :-</u>

१. शासन परिपत्रक,नगर विकास विभाग क्र.अमृत-२०१५/प्र.क्र.२०२/नवि-३३, दि.१०.०८.२०१५.

२. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.अमृत-२०१५/प्र.क्र.१९७/नवि-३३, दि.१३.१०.२०१५.

३. शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.अमृत-२०१७/प्र.क्र.२८/नवि-३३, दि.०८.०२.२०१७.

४. शासन पत्र,नगर विकास विभाग क्र.अमृत-२०१७/प्र.क्र.५५६/नवि-३३ दि. २५.०१.२०१८.

५. शासन पत्र, नगर विकास विभाग क्र.अमृत-२०१७/प्र.क्र.६१४/नवि-३३, दि.२१.०२.२०१८.

६. शासन निर्णय नगर विकास विभाग समक्रमांक दिनांक ०४ जून, २०१८

<u>प्रस्तावना :-</u>

नगर विकास विभागांतर्गत विविध नागरी संस्थांमार्फत विविध विकास कामे करण्यात येतात. या विकास कामांसाठी सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याकरीता नागरी स्थानिक स्वराज्य संस्था खाजगी सल्लागारांच्या सेवा उपलब्ध करुन घेतात. अशा खाजगी सल्लागारांच्या सेवा उपलब्ध करुन घेताना त्याकरिता आकारावयाच्या शुल्काबाबत समक्रमांकाच्या दिनांक ०४ जून, २०१८ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या आदेशांबाबत शासनाकडे प्राप्त झालेली निवेदने विचारात घेऊन त्यमध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

समक्रमांकाच्या दिनांक ०४ जून, २०१८ च्या शासन निर्णयाद्वारे विहीत करण्यात आलेले प्रकल्प व्यवस्थापन सल्लागारांचे दर पूर्वलक्षी प्रभावाने लागू करण्याबाबतच्या शासन निर्णयातील परिच्छेद ७ मधील सूचना अधिक्रमित करून त्या शासन निर्णयान्वये विहित केलेले दर दिनांक ०४ जून, २०१८ पासून भविष्यलक्षी प्रभावाने लागू करण्यात येत आहेत.

२. दिनांक ०४ जून, २०१८ च्या शासन निर्णयान्वये लागू केलेले दर राज्यातील सर्व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना (महानगरपालिका/ नगरपरिषदा/ नगरपंचायत) लागू राहतील. तसेच, हे

दर नगर विकास विभागामार्फत वितरीत करण्यात येणाऱ्या निधीमधून किंवा नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेच्या स्वनिधीतून हाती घेण्यात येणाऱ्या कामांसाठी लागू राहतील.

३. दिनांक ०४ जून, २०१८ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या तरतूदींमधील या सुधारणा मूळ शासन निर्णयाच्या दिनांकापासून म्हणजेच ०४ जून, २०१८ पासून लागू राहतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८१२१७१११११०४७२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षरीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2018.12.17 18:19:18 +05'30'

**( पां. जो. जाधव )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) महालेखापाल महाराष्ट्र-१, मुंबई.
२) मा.महालेखापाल महाराष्ट्र-२, नागपूर.
३) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई.
४) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मंत्री/ राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
६) मा.विरोधी पक्ष नेते, महाराष्ट्र विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
७) सर्व सन्माननीय संसद सदस्य/ विधानसभा/विधानपरिषद सदस्य
८) मा.मुख्य सचिव यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अपर मुख्य सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१४) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय,वरळी,मुंबई.
१५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

१७) विभागीय आयुक्त (सर्व)

१८) जिल्हाधिकारी (सर्व संबंधित)

१९) आयुक्त सर्व महानगरपालिका

२०) मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा/नगरपंचायती.

२१) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

२२) प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

२३) निवडनस्ती-नवि-१६, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

*****